<u>आषाढीवारी- २०२४</u>

आषाढी एकादशी निमित्त **नाशिक जिल्ह्यातील संत निवृत्तीनाथ महाराज** यांच्या पालखीसोबत असणाऱ्या भाविकांना मुक्कामाच्या ठिकाणी तात्पुरत्या शौचालयाची व्यवस्था व इतर सुविधा पुरविण्याच्या कामांना निधी वितरीत करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
**शासन निर्णय क्रमांकः तीर्थवि-२०२४/प्र.क्र.७७/यो-११**

बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ, फोर्ट,
मंत्रालय, मुंबई - ४००००१

**दिनांक: १४ जून, २०२४**

<u>संदर्भ</u>:-

१) मुख्य कार्यकारी अधिकारी, जि. प. नाशिक यांचे पत्र जा.क्रजिग्रावियंना/नि.म.पा./४६ /२४/दि.१२.०६.२०२४.

<u>प्रस्तावना</u> :-

मा. उप मुख्यमंत्री तथा वित्त मंत्री यांच्या २०२३ च्या अर्थसंकल्पीय भाषणामध्ये पुढीलप्रमाणे घोषणा केली आहे; **"संत ज्ञानेश्वर माऊली व संत तुकोबाराय यांचे पालखी सोबतच संत सोपान देव, संत निवृत्तीनाथ व संत मुक्ताई यांचे निर्मलवारी करिता २०.०० कोटी रूपये निधी देण्यात येईल".**

यानुषंगाने आषाढी एकादशीनिमित्त नाशिक जिल्ह्यातील संत निवृत्तीनाथ महाराज यांच्या पालखीसोबत असणाऱ्या भाविकांना तात्पुरते शौचालय, स्नानगृहे, पिण्याचे पाणी आवश्यक सोयी-सुविधा पुरविण्यासाठी संदर्भीय पत्रान्वये जिल्हा परिषद, नाशिक यांनी रु.२,२४,६६,०००/- इतका निधी उपलब्ध करुन देणेबाबत विनंती केली आहे. सदर निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय</u>:-

ग्रामीण तीर्थक्षेत्र विकास योजनेतंर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता ग्रामीण भागातील तीर्थक्षेत्रांच्या विकासाकरिता अनुदान (रु. २ कोटी ते रु.२५ कोटीपर्यंत) (२५१५ २५२१) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या योजनेंतर्गत एकूण रु.१००.०० कोटी एवढा निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे.

२. सदर अर्थसंकल्पीत तरतूदीमधून, आषाढी एकादशीनिमित्त नाशिक जिल्ह्यातील संत निवृत्तीनाथ महाराज यांच्या पालखीसोबत असणाऱ्या भाविकांना तात्पुरते शौचालय, स्नानगृहे, पिण्याचे पाणी अशा आवश्यक सोयी-सुविधा पुरविण्यासाठी **रु.२,२४,६६,०००/- (रुपये दोन कोटी चोवीस लक्ष सहासष्ट हजार फक्त)** इतका निधी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक यांना उपलब्ध करुन देण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत असून एकुण मंजूर

तरतुदीच्या ७५% प्रमाणात म्हणजेच **रु.१,६८,४९,५००/-** इतका निधी बी.डी.एस. (BDS) प्रणालीद्वारे मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक यांना वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर निधी आवश्यक बाबींवर खर्च झाला असल्याचे उपयोगिता प्रमाणपत्र जिल्हा परिषद, नाशिक यांनी शासनास व महालेखापालांस सादर करावे. तसेच, वितरीत निधी खर्च झाल्याचे उपयोगीता प्रमाणपत्र व निर्मलवारीत या बाबीवर (तात्पुरत्या शौचालयाची व्यवस्था, पिण्याचे पाणी व इतर सुविधा) झालेल्या एकूण खर्चाचा तपशील शासनास सादर केल्यानंतर उर्वरित निधीचे वितरण करण्यात येईल.

४. सदर अनुदान मागणी क्रमांक एल-३-२५१५-इतर ग्राम विकास कार्यक्रम-१९६-जिल्हा परिषद/ जिल्हास्तरीय पंचायतींना सहाय्य (००) (०७) ग्रामीण भागातील तीर्थक्षेत्रांच्या विकासाकरीता अनुदान (रु.२.०० कोटी ते रु.२५.०० कोटीपर्यंत) (२५१५ २५२१)-३१- सहायक अनुदाने (वेतनेतर) (दत्तमत) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सदर लेखाशीर्षाखाली उपलब्ध असलेल्या सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

५. सदर निधी नियोजन विभागाचा अनौ.संदर्भ क्र.१७३/१४४४ दि.१५/०५/२०२४ व वित्त विभागाचा अनौ. संदर्भ क्र.३८१/२०२४/व्यय-१५ दि.३०/०५/२०२४ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार वितरीत करण्यात येत आहे. तसेच, सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र: अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.१ एप्रिल, २०२४ अन्वये अटींची व शर्तीची पूर्तता करून निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०६१४११३०१३४७२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

KALU GONYA VALVI

Digitally signed by KALU GONYA VALVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=714701fc3db9c38a46f4cd82e1e450b51a9e92eede8c323934f82edb538d3b20, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8C5D0F275C3D9A21DB07FECF7919C2D83796E88930D62D44E7A4A6D4CBEE7E0E, cn=KALU GONYA VALVI
Date: 2024.06.14 12:34:22 +05'30'

**(का. गो. वळवी)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव,

२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर.

३) महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१,मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर.

४) विभागीय आयुक्त, आयुक्त कार्यालय, नाशिक विभाग, नाशिक.

५) जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, नाशिक.

६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक.

७) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक.

८) जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.

९) नियोजन विभाग, (का-१४४४) मंत्रालय, मुंबई-३२.

१०) वित्त विभाग (व्यय १५,अर्थसं १६,अर्थसं १७) मंत्रालय, मुंबई ३२.

११) कार्यासन क्र.यो-११, वित्त-१, वित्त-८, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

१२) निवड नस्ती (का.यो-११), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.